सार्वजनिक वितरण व्यवस्थेसाठी ई-लिलाव पध्दतीने एनसीडीईएक्स स्पॉट एक्सचेंज लि.यांचेकडील नोंदणीकृत पुरवठादारांमार्फत साखर खरेदी करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साखर २०१४/प्र.क्र.१२३/ना.पु.१९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १७ डिसेंबर, २०१४.

**वाचा**

१) **शासन निर्णय क्रमांकः क्र. साखर-२०१४/प्र.क्र.७७/नापु-१९, दिनांक : १९ जून, २०१४.**

**पार्श्वभूमी :-**

केंद्र शासनाने साखर कारखान्यांवरील नियंत्रण मे, २०१३ पासून हटविले व कारखान्यांकडील शिल्लक साखर घेण्यासाठी केंद्र शासनाने आदेशित केले. मात्र, सर्वसाधारणत: जून, २०१३ पासून कारखान्यांनी काही प्रमाणात साखर देण्यास नकार दिला. मार्च, २०१४ पर्यंत त्यातील काही कारखान्यांनी लेव्ही साखर देण्यास नकार दर्शवून न्यायालयामध्ये याचिका दाखल केल्या व त्यातील काही याचिकांवर उच्च न्यायालयाने स्थगिती आदेश दिले. माहे मार्च,२०१४ पर्यंत साखर नियतनाचे आदेश जिल्हानिहाय निर्गमित करुनही कारखान्यांनी साखर देणे नाकारल्यामुळे साखरेची उचल होवू शकलेली नाही. एकूणच कारखान्यांकडील नियंत्रित साखर घेणे दुरापास्त झाले.

२. दिनांक १३ ऑक्टोबर, २०१३ रोजी मा.मंत्रीमंडळाने निर्णय घेतल्यानुसार दिनांक ०२ नोव्हेंबर, २०१३ च्या शासन निर्णयानुसार राज्यामध्ये खुल्या बाजारातून साखर खरेदी करण्यासाठी ई-निविदा प्रक्रिया अवलंबिण्यात आली. या निविदा प्रक्रियेसाठी प्रथम व द्वितीय मुदतवाढ देवूनही निविदा प्रक्रियेस प्रतिसाद प्राप्त झाला नाही. त्यामुळे ही निविदा प्रक्रिया पुन्हा राबवावी लागणार आहे.

३. वरील निर्णयाप्रमाणे नवीन ई-निविदा प्रक्रिया राबवून साखर पुरवठा होण्याच्या दरम्यानच्या काळात, सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत साखर वाटपाची ही योजना पुढे चालू ठेवण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ लि., मुंबई यांचेमार्फत साखर कारखान्यांकडून साखर खरेदी करण्यासाठी मा.मंत्री, सहकार यांचे अध्यक्षतेखाली मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण व अध्यक्ष, साखर महासंघ व शासनाचे अधिकारी यांचेसमवेत दिनांक २५ फेब्रुवारी, २०१४ रोजी बैठक घेण्यात आली. या बैठकीत सविस्तर चर्चा होवून बैठकीत घेण्यात आलेला निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक ३ मार्च, २०१४ रोजी झालेल्या बैठकीत सादर करण्यात आला व झालेल्या निर्णयानुसार शासन निर्णय, क्रमांक साखर-२०१४/प्र.क्र.४४/ना.पु.१९, दिनांक २४ मार्च, २०१४ रोजी निर्गमित करण्यात आला. तथापि, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ लि., मुंबई व विभाग यांच्यामध्ये साखर खरेदीच्या किंमतीबाबत एकमत न झाल्यामुळे साखर संघाने साखर उपलब्ध करुन देण्यास असमर्थतता दर्शविली.

४. दरम्यानच्या कालावधीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेसाठी साखर पुरविणेबाबत एनसीडीईएक्स स्पॉट एक्सचेंज लि. या कंपनीने दिनांक १३ मार्च, २०१४ रोजी ई-लिलाव पध्दतीनुसार साखर त्यांच्यामार्फत खरेदी करुन लाभार्थ्यांना वितरीत करण्याबाबतच्या सादर केलेल्या प्रस्तावावर विचार करुन शासनाने सहा महिन्यांच्या कालावधीसाठी प्रायोगिक तत्वावर ई-लिलावाद्वारे साखर खरेदी करण्यास मान्यता दिल्यानुसार शासननिर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. साखर-२०१४/प्र.क्र.७७/नापु-१९, दिनांक : १९ जून, २०१४, अन्वये खरेदी करण्याच्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दती निश्चित करण्यात आली.

५. त्यानुसार माहे जुलै, २०१४ ते माहे नोव्हेंबर, २०१४ या पाच महिन्यांत सदर लिलाव आयोजित करून साखर खरेदी करण्यात आली. ही एकूण कार्यपध्दत शासनास अत्यंत पारदर्शी, स्पर्धात्मक व बाजारभावाच्या किंमतीच्या तुलनेने अतिशय लाभदायक अशी आढळून आल्याने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

(अ) सार्वजनिक वितरण व्यवस्थेसाठी NCDEX SPOT Exchange Ltd. यांचेकडील नोंदणीकृत पुरवठादार दर महिन्यासाठी लागणारी एकूण १,३९,१७५ क्विंटल इतकी साखर (सणासुदीचे माहे ऑगस्ट व ऑक्टोबर/नोव्हेंबर या दोन महिन्यांच्या सणासुदीसाठी लागणारी १,८३,७११ क्विंटल साखर) खरेदी करण्यासाठीची ही पध्दत पारदर्शक, आधुनिक व राज्य शासनाला बाजार भावाच्या तुलनेत कमी दरात साखर उपलब्ध करून देत असल्यामुळे, शासननिर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. साखर-२०१४/प्र.क्र.७७/नापु-१९ , दिनांक १९ जून, २०१४ मधील अटी व शर्ती आणि कार्यपध्दती नुसार यापुढेही चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(ब) लाभार्थ्यांना वेळेवर साखर पुरवठा व्हावा यासाठी, ज्या महिन्यासाठी साखर खरेदी करावयाची आहे, त्याच्या मागील महिन्याच्या शेवटच्या आठवडयात ई-लिलाव आयोजित करण्यात येईल.

(क) या नवीन पध्दतीत साखरेच्या किंमतीमध्ये वाहतूक, हमाली ,सर्व प्रकारचे कर अंतर्भूत असल्याने, मागील योजनेनुसार केवळ दुकानदारांना द्यावयाचे मार्जिन रु.६.३६/- प्रति क्विंटल व तालुका गोदाम ते दुकान यासाठीचे वाहतूक रिबेट रु. ६/- प्रति क्विंटल याप्रमाणे दरमहासाठीचे नियतन १,३९,१७५ क्विंटल दरमहा प्रमाणे वर्षातील दहा महिन्यांसाठी १३,९१,७५० क्विंटल नियतन व १,८३,७११ क्विंटल याप्रमाणे सणासुदीच्या दोन महिन्यांसाठी ३,६७,४२२ क्विंटल असे एकूण वार्षिक १७,५९,१७२ क्विंटल साखरेच्या परिमाणास रु.१२.३६/- प्रति क्विंटल प्रमाणे (प्रतिमाह मार्जिन व वाहतूक रिबेट खर्च) रु.२,१७,४३,३६५.९२ यास मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१४१२१७११३२४११२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Shiv Kapoor
Digitally signed by Deepak Shiv Kapoor
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICES, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Deepak Shiv Kapoor
Date: 2014.12.17 15:19:48 +05'30'

**( दीपक कपूर )**
सचिव
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हाधिकारी
३. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
४. साखर आयुक्त, शिवाजी नगर, पुणे
५. सर्व उप आयुक्त (पुरवठा)
६. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
७. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
८. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.(५ प्रती)
९. उप संचालक, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई (५ प्रती)
१०. उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), परळ, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचे कार्यालय, मुंबई
१६. महासंचालक माहिती व जनसंपर्क, मुंबई
१७. अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी

१८. वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई
१९.मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२०.मा.मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२१.मा.राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२२.सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
२३.एनसीडीईएक्स स्पॉट एक्सचेंज लि., ९ कैलास कमर्शियल कॉम्प्लेक्स, १ ला मजला, एल.बी.एस. मार्ग,
२४.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (१० प्रती)
२५.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
२६.निवड नस्ती (ना.पु.१९)